अव्वल कारकून संवर्गातून नायब तहसीलदार संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत.....
(पुणे विभाग)

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन आदेश क्रमांकः पदोन्न -२०२४/प्र.क्र.०८/ई-९ (भाग-२)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मशा/आस्था/कार्या-३/ईएसबी /पदोन्नती /२०२३ /१०२८७३७, दि.२१.११.२०२३

**शासन आदेश:-**

पुणे विभागातील अव्वल कारकून संवर्गातील खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यास नायब तहसिलदार (गट -ब, राजपत्रित) या संवर्गात सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार खालीलप्रमाणे नियमित पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच, त्यांची नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.६ येथे नमूद पदावर परिच्छेद क्र.३ येथील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**नियमित पदोन्नती:-**

**अव्वल कारकून : -**

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२८ | श्री. विजय रंभाजी घुगे | भ.ज. ड | दिव्यांग आरक्षणानुसार पात्र (गट अ- अल्पदृष्टी) | नायब तहसीलदार (निवडणुक), तहसिल कार्यालय इंदापुर, जि.पुणे |

३. सदर नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमीत झालेले नाहीत.

२. मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि. /१६ ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च

न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

३. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब पदांवर पदोन्नतीबाबत सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.२०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसुचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सा.प्र.वि. शासन निर्णय दि.१५.१२.२०१७ व दि.३०.०८.२०१८ नुसार विभागीय आयुक्त, पुणे यांनी कार्यवाही करावी.

६. निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधीन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

७. सदर निवडसुचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात या विभागाच्या दि.१२.०९.२०१६च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची विभागीय आयुक्त, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी आदेशाच्या दिनांकापासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून संबंधित कार्यालयाने नव्याने कार्यमुक्ती आदेश निर्गमीत करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे इतर कोणत्याही आदेशाची वाट न पाहता उक्त अधिकाऱ्याने पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

५. संबंधित अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबतचा अहवाल विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांनी तात्काळ शासनास सादर करावा.

६. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी. सदर आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न होणाऱ्या अधिकाऱ्याविरुध्द विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांनी तात्काळ शिस्तभंगाची कार्यवाही सुरु करावी तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी.

९. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने देण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०६२०११३२६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT
MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.06 20:26:18 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. जिल्हाधिकारी, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर.
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.